मानेसं/संदर्भ-०५/२९८१
१८।१०।०५

३८४९१

जिल्हा अल्पसंख्याक कल्याण समित्यांचे गठन करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्रमांक:राअआ-२००२/८६८/प्र.क्र.१४१/२००२/३५
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ७ ऑक्टोबर, २००५.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्रातील अल्पसंख्याक समाजाच्या सामाजिक, आर्थिक व शैक्षणिक उन्नतीसाठी तसेच स्थानिक अल्पसंख्याकांच्या समस्या तातडीने सोडविण्यासाठी प्रत्येक जिल्हयात जिल्हाधिकाऱ्यांच्या अध्यक्षतेखाली जिल्हा अल्पसंख्याक कल्याण समित्या स्थापन करण्याची मागणी महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने केलेली होती. या मागणीचा सांगोपांग विचार करून राज्यातील प्रत्येक जिल्हयात पुढील प्रमाणे जिल्हा अल्पसंख्याक कल्याण समित्यांचे गठन करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

| | | |
|---|---|---|
| १) | जिल्हाधिकारी | अध्यक्ष, |
| २) | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | पदसिध्द सदस्य |
| ३) | उप आयुक्त (प्रशासन) महानगरपालिका | पदसिध्द सदस्य |
| ४) | जिल्हा पोलीस अधिक्षक/पोलीस उप आयुक्त | पदसिध्द सदस्य |
| ५) | जिल्हा समाजकल्याण अधिकारी | पदसिध्द सदस्य |
| ६) | शिक्षणधिकारी, जिल्हा परिषद | पदसिध्द सदस्य |
| ७) | जिल्हा महिला व बालकल्याण अधिकारी | पदसिध्द सदस्य |
| ८ ते १३) | सहा अशासकीय सदस्य (अल्पसंख्याक समाजाचे प्रतिनिधी) | सदस्य |
| १४) | निवासी उप जिल्हाधिकारी | सदस्य सचिव. |

२. जिल्हा अल्पसंख्याक कल्याण समित्यांवरील अशासकीय सदस्यांच्या नियुक्त्या, संबंधित जिल्हाधिकाऱ्यांनी महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाच्या सल्ल्याने व जिल्हा पालकमंत्र्यांच्या मान्यतेने कराव्यात.

३. अशासकीय सदस्यांची नियुक्ती करतांना खालील निकष विचारात घेण्यात यावेत,

१) अशासकीय सदस्य हे त्याच जिल्हयातील अल्पसंख्याक समाजातील असावेत.
२) प्रत्येक अल्पसंख्याक समाजास प्रतिनिधीत्व मिळावे. जर एखाद्या जिल्हयात एखादा अल्पसंख्याक समाजाच्या लोकसंखेच्या अनुषंगाने संबंधित समाजाच्या प्रतिनिधींची नियुक्ती करणे शक्य नसल्यास त्याऐवजी सदर जिल्हयातील सर्वात जास्त लोकसंख्या असलेल्या समाजास जादा प्रतिनिधीत्व देण्यात यावे. परंतू अशासकीय सदस्यांची संख्या सहा पेक्षा जास्त नसावी.
४) गुन्हेगारी पार्श्वभूमी असणाऱ्या व्यक्तींची सदस्य म्हणून नियुक्ती करता येणार नाही.
५) नियुक्त करण्यात येणारे सदस्य पुरोगामी दृष्टीकोन असणारे असावेत व त्या समाजाचा त्यांच्यावर विश्वास असावा.
६) विविध क्षेत्रातील बुध्दिमान, प्रतिष्ठित व प्रामाणिक व्यक्तींची सदस्य म्हणून नियुक्ती करावी.

४. जिल्हा अल्पसंख्याक कल्याण समितीच्या विचारार्थ खालील विषय रहातील.

१) स्थानिक अल्पसंख्याक समाजाच्या शैक्षणिक समस्यांचा अभ्यास करून राज्य अल्पसंख्याक आयोगास योग्य त्या शिफारशी पाठविणे.

२) अल्पसंख्याक विशेषत: स्त्रियांमध्ये साक्षरतेचा प्रचार करणे.

३) स्थानिक अल्पसंख्याक शैक्षणिक संस्थांचा दर्जा सुधारण्याकरीता योग्य त्या उपाययोजना सुचविणे.

४) अल्पसंख्याकांची गाऱ्हाणी ऐकूण त्यावर वेळोवेळी उपाययोजना सुचविणे.

५) पंतप्रधानाच्या पंधरा कलमी कार्यक्रमाच्या अंमलबजावणीचा आढावा घेणे.

६) जिल्ह्यातील अल्पसंख्याकांचे सामाजिक, शैक्षणिक वा आर्थिक सर्वेक्षण करून माहिती पाठविणे.

७) जिल्ह्यात शांतता व जातीय सलोखा कायम ठेवण्यास प्रशासनास मदत करणे.

८) दंगलपिडीतांचे पुनर्वसन, आर्थिक मदत व बँकेकडून कर्ज मिळवून देण्यास सहाय्य करणे.

५. जिल्हा अल्पसंख्याक कल्याण समितीच्या बैठकांना उपस्थित राहणाऱ्या अशासकीय सदस्यांना कोणतेही मानधन व बैठक भत्ता देय होणार नाही.

६. अशासकीय सदस्यांचा कार्यकाल नियुक्तीच्या दिनांकापासून दोन वर्षे इतका असेल.

७. जिल्हा अल्पसंख्याक कल्याण समित्यांची दर महिन्यात एक बैठक आयोजित करण्यात यावी व बैठकीतील कार्यवाहीचा अहवाल शिफारशींसह महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास बैठकीनंतर १५ दिवसात सादर करण्यात यावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सु.घा.ध.क

( सु. ध. धात्रक )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१. मा.राज्यपालांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
४. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
५. मा.मुख्य सचिव,
६. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई,
७. विशेष कार्य अधिकारी, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई,
८. सर्व विभागीय आयुक्त,
९. सर्व जिल्हाधिकारी,
१०. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
११. सर्व मंत्रालयीन विभाग,
१२. सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने.
१३. मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील सर्व विभाग व कार्यालय प्रमुख,
१४. राज्य शासनाचे सर्व उपक्रम,
१५.* प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
१६.* प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
१७.* प्रबंधक, लोक आयुक्त उप लोक आयुक्त कार्यालय, मुंबई,
१८.* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
१९.* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
२०. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई (प्रसिध्दीसाठी),
२१. कक्ष अधिकारी, माहिती व तंत्रज्ञान कक्ष, मंत्रालय, मुंबई (२ प्रती वेबसाईट साठी)
२२. निवड नस्ती.
* पत्राने.